**१००० क्षमतेचे विभागीय स्तरावरील मुलांचे वसतिगृह, युनिट नं.२, दिघोरी, नागपूर इमारत भाडे मंजूरीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच -२०१४/ प्र.क्र.१७६ /शिक्षण-२**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०१४.

<u>वाचा -</u>

**१) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र :सकआ/शिक्षण/१००० क्षमता शागृह/नागपूर/इ.भा मंजुरी/ २०१५/का-५ अ/२४७१, दि.२९.०९.२०१४.**

<u>**शासन निर्णय-**</u>

अनुसूचित जाती मुला-मुलींसाठी विभागीय स्तरावर १००० विद्यार्थी क्षमतेची शासकीय वसतिगृहे सुरु करण्याचा निर्णय राज्य शासनाकडून घेण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत अनुसूचित जाती मुलांसाठी दिघोरी, नागपूर येथे विभागीय स्तरावर शासकीय वसतिगृह सुरु करण्यात आले असून सदर वसतिगृहाच्या युनिट क्र. २ (एकूण विद्यार्थी क्षमता संख्या २५०) साठी श्री.कृष्णकुमार शिवप्रसाद जैस व सौ.कविता कृष्णकुमार जैस यांचे मालकीची प्लॉट क्र.१५, मधुवात्सल्य को. ऑपरेटिव्ह हाऊसिंग ले-आऊट, रामकृष्णनगर, दिघोरी, मौजा दिघोरी, प.ह.न.३४, वॉर्ड नं-२१, उमरेड रोड, नागपूर महानगरपालिका व नागपूर सुधार प्रन्यास हद्दीतील एकूण ५८२.०० चौ.मी. बांधकाम असलेली इमारत संपूर्ण टेरेस १०१.२७ चौ.मी. व ७४.४० चौ.मी. लांब संरक्षण भिंतीसह दि.०५.०८.२०१३ ते दि.०४.०८.२०१६ या कालावधीकरिता शासनाने भाडेतत्वावर ताब्यात घेतली आहे. या इमारतीचे भाडे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, नागपूर यांनी दरमहा रु.१,०७,४००/-फक्त पालिका कर वगळून प्रमाणित करुन दिले आहे.

२. या शासकीय वसतिगृहाकरिता घेतलेल्या इमारतीच्या भाडयाचा तपशिल खालील प्रमाणे आहे:-

| अ. क्र. | इमारत मालकाचे नाव | इमारत | ताबा घेतल्याचा दिनांक | प्रमाणित केलेले भाडे(दरमहा) | क्षेत्रफळ | मंजूर करावयाचे दरमहा एकूण भाडे व कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | श्री.कृष्ण कुमार शिवप्रसाद जैस व सौ.कविता कृष्णकुमार जैस | इमारत (१ ते ५ मजले) एकूण ५८२.००चौ.मी + संपूर्ण टेरेस १०१.२७ चौ.मी. + ७४.४० चौ.मी. लांब संरक्षण भिंत | दि. ५.०८.२०१३ | रू.१,०७,४००/- | इमारत -५८२.०० चौ.मी + संपूर्ण टेरेस १०१.२७ चौ.मी. + ७४.४० चौ.मी. लांब संरक्षण भिंत | रू. १,०७,४००/- (सर्व कर गळून) दि. ०५.०८.२०१३ ते दि.४.०८.२०१६ |

३. वरील प्रमाणे विचाराधीन असलेल्या प्रस्तावावर विचार करुन २५० क्षमतेचे विभागीय स्तरावरील मुलांचे वसतिगृह, युनिट नं.२, दिघोरी, नागपूर या वसतिगृहासाठी श्री.कृष्णकुमार शिवप्रसाद जैस व सौ.कविता कृष्णकुमार जैस यांच्या मालकीच्या भाडयाने घेतलेल्या इमारतीचे भाडे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, नागपूर यांनी प्रमाणित केले आहे. त्यानुसार इमारत मालकांनी केलेल्या कराराप्रमाणे परिच्छेद २ येथील तपशिलात नमूद केल्याप्रमाणे सदर वसतिगृहासाठी दि.०५.०८.२०१३ ते दि.०४.०८.२०१६ या कालावधीकरिता दरमहा रु.१,०७,४००/- (अक्षरी रुपये एक लाख सात हजार चारशे मात्र) (सर्व कर वगळून) इतके इमारत भाडे मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. मात्र सर्व कर इमारत मालकाने भरणे आवश्यक राहील. तसेच, इमारतीच्या आवारातील बोअरवेलचा इलेक्ट्रिक मोटरपंप बिघडल्यास त्याची दुरुस्ती इमारत मालकाने तात्काळ करणे बंधनकारक राहील. तसेच, वसतिगृहासाठी पाण्याबाबत कोणतीही तक्रार प्राप्त होणार नाही, याची काळजी इमारत मालकाने घ्यावी.

४. सदर वसतिगृहात प्रवेशित विद्यार्थ्यांना शासकीय नियमाप्रमाणे जेवढी जागा अनुज्ञेय आहे, तेवढ्याच जागेचे क्षेत्रफळ विचारात घेऊन भाडे अदा करण्याची कार्यवाही सहायक आयुक्त, समाज कल्याण, नागपूर यांनी करावी. जास्तीचे भाडे अदा झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी सहायक आयुक्त, समाज कल्याण, नागपूर यांची राहील.

५. नागपूर येथील विभागीय स्तरावरील मुलांचे वसतिगृह, युनिट नं.२, दिघोरी, नागपूर या वसतिगृहासाठी भाड्याने घेतलेल्या इमारतीचे भाडे श्री. कृष्णकुमार शिवप्रसाद जैस व सौ.कविता कृष्णकुमार जैस यांना रेखांकित धनादेशाद्वारे समसमान देय राहील.

६. गृहप्रमुख, १००० क्षमतेचे विभागीय स्तरावरील मुलांचे वसतिगृह, युनिट नं.२, दिघोरी, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासकीय वसतिगृहासाठी संपूर्ण भाड्याची रक्कम संबंधितास यापूर्वी अदा केली असेल तर सदर भाडे रक्कम समायोजित करण्याची कार्यवाही त्यांनी नियमानुसार करावी.

७. सदर इमारत मालकास भाडे अदा करताना आयकर विषयक असणाऱ्या "स्त्रोताच्या कपातीबाबत (Tax deducted at source) नियमानुसार योग्य ती कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

८. यावर होणारा खर्च हा अर्थसंकल्पित लेखाशिर्ष " सामाजिक न्याय विभाग , मागणी क्रमांक एन-३, २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण (०१) (१३), अनुसूचित जातीतील मुले व मुली यांच्याकरिता शासकीय वसतिगृहे सुरु करणे व त्यांचे (नविन वसतिगृहे) (२२२५३३४२) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्याखाली केलेल्या सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

९. हा शासन निर्णय वित्त विभाग, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग १ ते ५, क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दि.१५ मे, २००९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११२१५०८५७०५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2014.11.15 10:56:45 +05'30'

**( शि.सो.चौरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१.आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२.प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, नागपूर.
३.सहायक आयुक्त, समाज कल्याण, नागपूर.
४.महालेखापाल, महाराष्ट्र -२ ( लेखा परिक्षा) / (लेखा अनुज्ञेयता ) / नागपूर .
५.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

६.वित्त विभाग, (व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२.

७.श्री.कृष्णकुमार शिवप्रसाद जैस व सौ.कविता कृष्णकुमार जैस, प्लॉट क्र.१५, मधुवात्सल्य को. ऑपरेटिव्ह हाऊसिंग ले-आऊट, रामकृष्णनगर, दिघोरी, मौजा दिघोरी, प.ह.न.३४, वॉर्ड नं-२१, उमरेड रोड, नागपूर.

८.अवर सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

९.निवड नस्ती.